सन २०१८-१९ मधील अर्थसंकल्पित
तरतूदीचे वितरण करणेबाबत.
मागणी क्र. व्ही. २ मुख्य लेखाशीर्ष (३४५१०३०४)
२८- व्यावसायिक सेवा या उपशीर्षाखाली विशेष
सरकारी वकीलांची फी अदा करण्यासाठी ८०%
निधी वितरित करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र.बीयूडी २०१८/ प्र.क्र.३/रोखशाखा**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २१ डिसेंबर, २०१८

**वाचा :-** १) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१८/प्र.क्र.६९/अर्थ -३
दि. ०२.४.२०१८
२) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१८/प्र.क्र. १३/२०१८
दि. ०४.०४.२०१८

**प्रस्तावना :-**

सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्र. याचिका ०४१७/प्र.क्र. ६०/२०१७ / २-स दि. १८.१०.२०१८ अन्वये रिट याचिका क्रमांक ३७१२/२०१७ कळसकरवाडी विविध कार्यकारी सोसायटी व इतर विरूद्ध महाराष्ट्र शासन या न्यायालयीन प्रकरणात नियुक्तश्री. एस.यू कामदार या विशेष सरकारी वकीलांची फी सचिवालयीन सेवा (३४५१०३०४ ) २८- व्यावसायिक सेवा या उद्दिष्टातून करण्यास मान्यता दिलेली आहे.

२. सदर बाबीअंतर्गत सन २०१८-१९ या वर्षासाठी मंजूर अर्थसंकल्पीय रू. ७.०० लाख तरतुदीपैकी ७०% रक्कम रू. ४.९०लाख रक्कमेतून खर्च झालेली रक्कम रू. ४.०५वजा जाता शिल्लक राहिलेली रक्कम रू. ८५०००/- सदर देयक अदा करण्यासाठी अपुरी आहे. त्यामुळे २८- व्यावसायिक सेवा या उपशीर्षाअंतर्गत मंजूर असलेला १००% निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय-**

सन २०१८-१९ करिता मागणी क्र. व्ही-२ मुख्य लेखाशीर्ष ( ३४५१०३०४) सचिवालयीन आर्थिक सेवा - २८- व्यावसायिक सेवा या बाबीअंतर्गत मंजूर अर्थसंकल्पित रू. ७.०० लाख तरतुदीपैकी ८०% म्हणजेच रू. ५.६० लाख निधी एवढा निधी मंजूर करून खर्च करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. वरीलपैकी अवितरित निधी रू. ७००००/- अर्थसंकल्प वितरण प्रणाली वर उपलब्ध करून देण्याची कार्यवाही १७-स कार्यसनामार्फत त्वरित करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ४६६/२०१८/व्यय-२/ दि. २४.०९.२०१८ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८१२२११६०३५६९००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, serialNumber=b9bf7a534d8f1272bd902482bf95b556a5baefdddce18574a78fa2d8d0957d1f, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2018.12.21 16:09:30 +05'30'

**( रमेश शिंगटे )**
अवर सचिव तथा सहनिबंधक सहकारी संस्था

**प्रत माहितीसाठी व योग्य त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित :-**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. महालेखाकार, महाराष्ट्र- १, मुंबई.
३. महालेखाकार, महाराष्ट्र- २, नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. अवर सचिव (कार्या १७ स), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सरकारी वकील, मूळ शाखा, मा. उच्च न्यायालय, रिट सेल, मुंबई
७. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प -१३, मंत्रालय, मुंबई
८. उपसचिव आस्थापना, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
९. कार्यासन अधिकारी १८-स सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१०. निवड नस्ती-१८-स/रोखशाखा